कांदळवन (Mangrove) क्षेत्राच्या संरक्षण, संवर्धन व व्यवस्थापनांतर्गत ३३ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२२/प्र.क्र.६१/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १४ मार्च, २०२२.

**पहा :-**

१) महसूल व वन विभागाचे शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१०/प्र.क्र.९२/फ-१, दि. १.११.२०११
२) महसूल व वन विभागाचे शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक १३.०९.२०१९ व दिनांक २१.०९.२०२१.
३) शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्रमांक एस-१०/२०२१/प्र.क्र.२५१/फ-३, दिनांक १६.०३.२०२१ व दिनांक १३.०९.२०२१.
४) वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. २२.०२.२०२२.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.४८/२१-२२/२४९; दिनांक ९.०२.२०२२.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्रातील ७२० कि.मी. तटीय क्षेत्रातील कांदळवनाचे संरक्षण, संवर्धन व व्यवस्थापन करण्यासाठी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये एकूण ३७ अस्थायी पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर ३७ अस्थायी पदे दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्रमांक ३ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

वन विभागातील पदांच्या आढाव्याअंती संदर्भ क्र. २ च्या दिनांक १३.०९.२०१९ व दिनांक २१.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये मान्य केलेल्या सुधारित आकृती बंधातील २६५७३ पदांमध्ये सदर योजनेतंर्गत ३७ अस्थायी पदांपैकी ३३ अस्थायी पदांचा समावेश आहे. तर खलाशी - २ पदे, डिंघीचालक- २ पदे असे एकूण ४ पदे निरसित करण्यात आलेली आहेत. त्यानुषंगाने खालील विवरणपत्र अ मध्ये दर्शविलेल्या ३३ अस्थायी पदांना आता दिनांक २८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याची प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. ५ अन्वये विनंती केली आहे.

**विवरणपत्र - अ**

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सहा. वनसंरक्षक | १ |
| २ | वनक्षेत्रपाल | ४ |
| ३ | वनक्षेत्र सर्वेक्षक | १ |
| ४ | सर्वेक्षक | २ |
| ५ | वनरक्षक | १२ |
| ६ | लघुलेखक (कनिष्ठ श्रेणी) | १ |
| ७ | मुख्य लेखापाल | १ |
| ८ | लेखापाल | ४ |

| | | |
|---|---|---|
| ९ | लिपिक | ५ |
| १० | नौकाचालक | २ |
| एकूण | | ३३ |

२. वित्त विभागाच्या दिनांक २२.०२.२०२२ च्या शासन निर्णयानुसार प्रशासकीय विभागांना त्यांच्या अधिनस्त अस्थायी पदांना दिनांक ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार उपरोक्त विवरणपत्रात दर्शविल्यानुसार ३३ अस्थायी पदांना **दिनांक १.०३.२०२२ ते दिनांक ३१.०८.२०२२** या कालावधीकरिता खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

अ) सदर ३३ अस्थायी पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नाहीत.

ब) सदर ३३ अस्थायी पदे भूमी अभिलेख कार्यालयातील असून ती वन विभागातील पदांच्या आढाव्याअंती संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मान्य केलेल्या आकृतीबंधातील पदांमध्ये समाविष्ट असणे आवश्यक आहे.

३. प्रस्तुत प्रकरणी मँग्रोव्ह व्यवस्थापन, संरक्षण व संवर्धनासाठी निर्माण करण्यात आलेले पद जेव्हा (Out Sourcing) बाह्य स्त्रोताद्वारे भरले जातील तेव्हा सदर आस्थापनेवरील येणारा मानधनावरील खर्च २४०६ - वनीकरण व वन्यजीवन (२४०६ ७२२३), १०१ (११) वनसंधारण व विकास, (११) (३२) १३ केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशींनुसार वनांचे व्यवस्थापन याकरिता केंद्र सहाय्य (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. मात्र ज्यावेळी सदर पदे नियमित अधिकारी / कर्मचाऱ्यांमार्फत भरली जातील त्या वेळी त्यांचे वेतन व भत्ते मुख्य लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) १०१ वनसंरक्षण व विकास (०१) (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) या लेखाशिर्षा खाली सन २०२१-२२ या वित्तीय वर्षातील मंजूर होणाऱ्या अनूदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २२.०२.२०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३१५१४५०२५८०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=Personal,
pseudonym=bb348b74c34d5cdc104457bb077cbbab2753fda99613688793f8ffb2d4595af5,
2.5.4.20=d399ba42648ff6007bc88b201ae47aa7d8a80a09e22cffd4c08887e4e01ce080, postalCode=416519, st=MAHARASHTRA,
serialNumber=b752370b557d0a3e58b4b069230bc54f6a13d04798d2ee7a3f1c7dcc5655271c, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2022.03.15 14:53:39 +05'30'

**( डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वनसंरक्षक ( मंत्रालय)**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कांदळवन कक्ष, मुंबई.
६) अपर मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
७) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे / कोल्हापूर.
८) सर्व संबंधित उप वनसंरक्षक.
९) फ-४ / फ-८ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.